क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य योजनेंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- क्रीडासु-३०२३/प्र.क्र.२७/कीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०१ जून, २०२३

**वाचा:-**

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. राक्रीधो-२०११/प्र.क्र. ५५/क्रीयुसे-१, दि. १४ जून, २०१२.

२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. राक्रीधो-२०१२/प्र.क्र.२६०/क्रीयुसे-१, दि. ०१ मार्च, २०१४.

३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. क्रीसुनि/आर्थिक सहाय्य/२०२०-२१/का-९/५८११ दि.२०.१०.२०२०.

**प्रस्तावना:-**

"क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य करणे" ही क्रीडा धोरणातील एक महत्वाची शिफारस आहे. दर्जेदार क्रीडा सुविधा निर्माण करुन त्याद्वारे खेळाडूंच्या कामगिरीत वाढ करुन राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय खेळाडू निर्माण करण्यास चालना देणे हे या योजनेचे उद्दिष्ट आहे. यासंदर्भातील सविस्तर कार्यपध्दती उपरोक्त संदर्भाधीन क्र. (२) येथील शासन निर्णय दिनांक ०१ मार्च, २०१४ अन्वये विहीत करण्यात आली आहे. त्यानुसार राज्यातील खाजगी / शासनाच्या मार्फत चालविण्यात येणाऱ्या व राज्य शासनाच्या संबंधित विभागांनी मान्यता दिलेल्या शैक्षणिक संस्था,स्थानिक/नागरी स्वराज्य संस्था, स्थानिक स्वराज्य संस्थेच्या शाळा, कनिष्ठ महाविद्यालये, आदिवासी विकास विभागाच्या आश्रमशाळा, राज्य शासनाची विभागीय / जिल्हा/तालुका क्रीडासंकुले, विविध खेळांच्या विकासासाठी कार्यरत असणाऱ्या व सार्वजनिक विश्वस्त अधिनियम १९५० किंवा संस्था नोंदणी अधिनियम १८६० अन्वये पंजीबध्द असतील अशा व्यायाम संस्था, क्रीडा मंडळे, क्रीडा संघटना इत्यादींना क्रीडा सुविधा निर्मितीस ७५:२५ (शासनाचा हिस्सा ७५% व संबधित पात्र संस्थेचा हिस्सा २५ %) याप्रमाणे आर्थिक सहाय्य देण्यात येते तसेच त्याचप्रमाणे क्रीडा साहित्यासाठी आर्थिक सहाय्य देण्यात येते. यांसदर्भात संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णयातील परि.क्र.४ (अ) व (ब) नुसार अटी शर्ती स्पष्ट केल्या आहेत. त्यानुषंगाने क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांनी संदर्भ क्रमांक ३ अन्वये पात्र संस्थांचे प्रस्ताव शिफारशीसह शासनास सादर केले आहेत. सदर शिफारशींना अनुसरुन व संदर्भाधिन शासन निर्णय दि.१.३.२०१४ मधील अटी व शर्तीच्या अधीन राहून क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य देण्याच्या प्रस्तावास तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

खालील परिशिष्ट-अ मधील शिफारसप्राप्त संस्थेस संदर्भाधिन शासन निर्णय, दिनांक ०१ मार्च, २०१४ मध्ये नमूद अनुदानासाठीची पात्रता व अनुदान मंजूरीच्या अटी व शर्तीचे पालन करण्याच्या तसेच प्रकल्पाच्या अंदाजपत्रकीय किंमतीची तपासणी करण्याच्या व अन्य अटींच्या अधीन राहून

विहीत खर्च मर्यादेचा विचार करता स्तंभ-३ येथे नमूद क्रीडा सुविधा निर्मितीसाठीच्या प्रकल्पासाठी स्तंभ-६ नुसार राज्य शासनाच्या विहीत अनुदान मर्यादेत (७५ %) अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्याच्या प्रस्तावास तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**परिशिष्ट-अ**

| **अ. क्र** | **संस्थेचे नाव** | **क्रीडा सुविधा प्रकल्प** | **प्रकल्पाची अंदाजपत्रकीय रक्कम** | **शा.नि. दि.१.३.२०१४ अनुसार प्रकल्पावरील विहीत एकूण खर्च मर्यादा** | **राज्य शासन अनुदान मर्यादा (७५%)** | **संस्थेचा हिस्सा (२५%)** |
|---|---|---|---|---|---|---|
| *१* | *२* | *३* | *४* | *५* | *६* | *७* |
| १ | राजर्षी शाहू शिक्षण संस्था, मु.पो.इनाम-धामणी, ता.मिरज, जि.सांगली | बंदिस्त प्रेक्षागृह | १२५.०४ | १२०.०० लक्ष | ९०.०० लक्ष | ३०.०० लक्ष |

२. उपरोक्त संस्थेस शासन निर्णयानुसार निश्चित केलेल्या अनुदान वितरणाबाबतच्या अटी/शर्ती तपासून व विहीत कार्यपध्दतीनुसार निधी वितरणाबाबतचा प्रस्ताव आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी स्वतंत्रपणे शासनास सादर करावा. सदर प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत, निधी उपलब्धतेनुसार तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या वित्तीय निर्देशानुसार "मागणी क्र.ई-३ लेखाशिर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (४०) क्रीडा सुविधा, (४०) (०१) क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य करणे (कार्यक्रम) (२२०४-५७०६), ३१ सहायक अनुदाने वेतनेतर" या लेखाशिर्षाखाली निधी वितरणासंदर्भात स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६०११९१०३२२९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2023.06.01 19:11:52 +05'30'

**( रणसिंग डेरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
६. सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक
९. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१०. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
११. मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, कोल्हापूर (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१४. जिल्हा क्रीडा अधिकारी, सांगली (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१५. वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१६. नियोजन विभाग (कार्यासन-१४७१) मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती (क्रीयुसे-१).